**प्रतिवर्षी दि. २० ऑगस्ट रोजी (माहिती तंत्रज्ञान दिन)**
**ई-गव्हर्नन्स् गुणवत्ता पारितोषिके देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक मातंसं/नस्ती० ९ /प्र.क्र. ४३ /३९
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: ११ ऑगस्ट, २००९

**प्रस्तावना:-**

शासनामार्फत जनतेस पुरविल्या जाणाऱ्या सेवा सुविधा पारदर्शकपणे, अभिनव पध्दतीने, जलदगतीने, नजिकच्या ठिकाणी व एकत्रितरित्या देणे हे उत्तम प्रशासनाचे द्योतक आहे. माहिती तंत्रज्ञानाच्या वापरामुळे अशा सेवा अत्यंत वेगाने व स्वस्त दरात देता येतात. राज्य शासनाच्या काही विभागामधुनच असा प्रयत्न केला गेला / जात आहे. उदा. विक्रीकर विभागातील विवरण पत्राचे ई-फाईलिंग, दुय्यम निबंधक कार्यालयातुन दस्तऐवजाचे संगणकीकृत नोंदणी, मंत्रालयीन कर्मचाऱ्यांच्या उपस्थितीची बायोमॅट्रीक पध्दतीने नोंदणी, राज्य परिवहन विभागाचे स्मार्ट कार्ड योजना इ. तथापि अशा प्रयत्नांची व्याप्ती व गती कमी आहे व त्यात वाढ करण्याची आवश्यकता आहे. ई-गव्हर्नन्सच्या माध्यमातुन महाराष्ट्र शासन हे नेहमीच जनतेस सेवा पुरविण्यासाठी अग्रेसर राहिले आहे. राज्यातील विविध शासकीय, निमशासकीय तसेच सार्वजनिक उपक्रम, महामंडळे व मंडळे, सहकारी संस्था, शैक्षणिक संस्था इ. ठिकाणी ई-गव्हर्नन्सच्या माध्यमातुन जनहित व प्रशासकीय गतिमानता यास प्रोत्साहन देत निकोप स्पर्धा निर्माण व्हावी या हेतुने शासन दि. २० ऑगस्ट दिनी माहिती तंत्रज्ञान दिनाचे औचित्य साधुन ई-गव्हर्नन्स पारितोषिके देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. या अनुषंगाने शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

राज्य शासनाचे विविध शासकीय, निमशासकीय कार्यालये, सार्वजनिक उपक्रम, महामंडळे व मंडळे, सहकारी संस्था, शैक्षणिक संस्था, सरकारी रुग्णालये, न्यायीक व इतर संस्था इत्यादी ठिकाणी ई-गव्हर्नन्सचा प्रभावीपणे व कुशलतेने वापर केला असल्यास त्याची दखल घेवुन राज्य शासनाच्या माहिती तंत्रज्ञान संचालनालयामार्फत दरवर्षी २० ऑगस्ट (माहिती तंत्रज्ञान) दिनाचे औचित्य साधुन पारितोषिके देण्यात येतील.

२. माहिती तंत्रज्ञानाचा प्रशासकीय कामकाजामध्ये प्रभावी व यशस्वीपणे जनहिताच्या दृष्टीने वापर करणाऱ्या शासनातील संस्थांना / घटकांना खालील ६ बाबींमध्ये उत्कृष्ट कार्य करण्याबाबत पारितोषिके देण्यासाठी निवड करण्यात येईल:-

(अ) सर्वोत्कृष्ट ई-गव्हर्नन्स्.
(E-Governance Excellence Awards)

(ब) ई-गव्हर्नन्स्च्या सहाय्याने कार्यपध्दतीत उत्कृष्ट बदल.
(Excellence in Process Re-engineering)

(क) ई-गव्हर्नन्स्द्वारे नागरीकेंद्रीत सुविधांचे उत्कृष्ट प्रदान.
(Excellence in Citizen centric Service delivery)

(ड) उत्कृष्ट वेबसाईट / पोर्टल.
(Best website / portal)

(इ) माहिती तंत्रज्ञानाचा प्रशासनात अभिनव वापर.
(IT Innovator of the year)

(फ) माहिती तंत्रज्ञानाचा पर्यावरणासाठी वापर.
(IT for Environment Award)

३. विभागांच्या प्रशासकीय प्रमुखांनी विभागाच्या अखत्यारितील क्षेत्रीय कार्यालये, सार्वजनिक उपक्रम, महामंडळे, मंडळे, प्राधिकरणे, सहकारी, शैक्षणिक, न्यायिक इ. संस्थांकडुन उपरोक्त माहिती व तंत्रज्ञानाच्या ६ क्षेत्रांमध्ये केलेल्या कामाबाबतचा अहवाल प्राप्त करावा. त्यानंतर सचिव स्तरावर सदर पारितोषिकांसाठी या अहवालांचे मुल्यमापन करुन वर निर्देशित केलेल्या ६ क्षेत्रांमध्ये प्रत्येकी किमान एक अहवाल माहिती तंत्रज्ञान संचालनालयाकडे प्रत्येक वर्षाच्या ३० जुन पर्यंत अनिवार्यपणे पाठवावा.

४. पारितोषिके देण्यासाठी माहिती तंत्रज्ञान संचालनालयांतर्गत एक समिती गठीत करण्यात येईल व विविध विभागांकडुन प्राप्त झालेले प्रस्ताव समितीपुढे सादर करण्यात येवुन त्यामधील वरील ६ क्षेत्रांपैकी प्रत्येकी ३ प्रस्तावांची या समितीद्वारे अंतिमतः निवड करण्यात येईल.

या शासन निर्णयाची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक सांकेतांक २००९०८१११४१३१२००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**(डॉ.अजय भुषण पांडेय)**
**सचिव,(माहिती तंत्रज्ञान)**

**प्रति**
राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्यसचिव यांचे खाजगी सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषद/महानगरपालिकांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा) मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा) मुंबई,
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
सचिव,महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,(विधान परिषद /विधान सभा),मुंबई,
सर्व नगरपरिषदांचे मुख्याधिकारी,
व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई ४०० ००४, संचालक,शासकीय मुद्रण व लेखनसामग्री,मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मुंबई
मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
निवड नस्ती (२ प्रती).